


**महाराष्ट्र शासन**

**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग**

**शासन ज्ञापन क्र. सेलाभ-२८२१/प्र.क्र.४८/ना.पु.१५**

मंत्रालय (विस्तार), मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई- ४०० ०३२
दिनांक : १५ फेब्रुवारी, २०२२.

**विषय :-** कै.प्रकाश गजभिये, शिपाई, तहसिल कार्यालय, सावनेर, जि.नागपूर यांचा कोव्हीड १९-च्या सार्वत्रिक साथीच्या अनुषंगाने उद्भवलेल्या परिस्थितीमध्ये गावातील गरजू/गरीब रहिवाशांना धान्य व जेवणाचे कीट वाटप करण्याचे कर्तव्य पार पाडताना कोवीड-१९ चा संसर्ग होऊन मृत्यू झाल्याने त्यांच्या वारसदारांना सानुग्रह सहाय्य रु.५० लाख मंजूर करण्याबाबत.

**संदर्भ :-** १) शासन निर्णय, वित्त विभाग क्र.संकीर्ण-२०२०/प्र.क्र.४/व्यय-९, दिनांक २९/०५/२०२० , दि.१४/१०/२०२० व दिनांक १४/०५/२०२१.
२) जिल्हा पुरवठा अधिकारी, नागपूर यांचे पत्र क्र.जिपुअ/क.लि आस्था/कावि ४८/२०२१, दिनांक २२/१/२०२१ व दिनांक १२/५/२०२१.

**ज्ञापन :-**

तहसिल कार्यालय, सावनेर, जि.नागपूर येथे कार्यरत श्री.प्रकाश गजभिये, शिपाई यांचा कोव्हीड-१९ च्या सार्वत्रिक साथीच्या अनुषंगाने उद्भवलेल्या परिस्थितीमध्ये तहसिलदार, सावनेर यांच्या आदेशानुसार कोरोना विषाणू (कोव्हिड-१९) **"प्रतिबंधात्मक उपाययोजना"** अंतर्गत गावातील गरजू/गरीब रहिवाशांना धान्य व जेवणाचे कीट वाटप करण्याचे कर्तव्य पार पाडताना त्यांचा कोरोना विषाणू संसर्गाने दिनांक १४/०९/२०२० रोजी मृत्यू झाला आहे.

२. जिल्हा पुरवठा अधिकारी, नागपूर यांनी वित्त विभाग क्र.संकीर्ण-२०२०/प्र.क्र.४/व्यय-९, दिनांक २९/०५/२०२० अनुसार श्री.प्रकाश गजभिये यांच्या वारसदारांना रु.५०,००,०००/- (रुपये पन्नास लक्ष फक्त) इतक्या रक्कमेच्या सानुग्रह सहाय्य मिळण्याबाबतचा प्रस्ताव सादर केला आहे.

३. तहसिल कार्यालय, सावनेर, जि.नागपूर यांच्या दिनांक १७/०४/२०२० रोजीच्या आदेशान्वये श्री.गजभिये यांची कोरोना विषाणू (कोव्हिड-१९) प्रतिबंधात्मक उपाययोजना अंतर्गत गावातील गरजू/गरीब रहिवाशांना धान्य व जेवणाचे कीट वाटप करण्याकरिता नेमणूक करण्यात आली होती.

४. जिल्हा पुरवठा अधिकारी, नागपूर यांनी कै. गजभिये हे मृत्युच्या तारखेपूर्वी १४ दिवस नियमित कर्तव्यावर हजर होते व कोरोना विषाणू (कोव्हिड-१९) प्रादुर्भाव रोखणेसाठीचे **"प्रतिबंधात्मक उपाययोजना"** अंतर्गत गावातील गरजू/गरीब रहिवाशांना धान्य व जेवणाचे कीट वाटप करण्याचे कर्तव्य बजावत होते, असे प्रमाणित केले आहे.

५. लता मंगेशकर हॉस्पिटल, नागपूर यांनी कै. प्रकाश गजभिये यांचा मृत्यू "कोव्हीड -१९" चा संसर्गाने झाला असल्याबाबत मृत्यू अहवाल दिलेला आहे.

६. **नागपूर** महानगरपालिका कार्यालय, नागपूर यांनी कै. प्रकाश गजभिये यांचा मृत्यू हा "कोव्हीड -१९" या रोगाच्या संसर्गामुळे झालेला आहे, असे प्रमाणित केले आहे.

७. त्यानुसार, जिल्हा पुरवठा अधिकारी, नागपूर यांच्या अधिपत्याखालील तहसिलदार कार्यालय, सावनेर यांच्या आस्थापनेवर कार्यरत कर्मचारी कै.प्रकाश गजभिये, शिपाई यांच्या नामनिर्देशित वारसदारांना रक्कम रु.५०,००,०००/- (रुपये पन्नास लक्ष फक्त) सानुग्रह सहाय्य म्हणून प्रदान करण्यास याव्दारे मंजूरी देण्यात येत आहे.

८. उक्त खर्च "मागणी क्र.एम-२, मुख्य लेखाशीर्ष २४०८-अन्न,साठवण व वखार साठवण, (०१) अन्न (१०१) प्रापण व पुरवठा, गौण शीर्ष (०३), व किंमत नियंत्रण (०३) (०२) मुफसल (अनिवार्य) (२४०८ ०१०८) -०१ वेतन " या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व त्या लेखाशिर्षाखालील अनुदानातून भागविण्यात यावा.

९. सदर ज्ञापन वित्त विभाग, शासन निर्णय, दिनांक २९/०५/२०२०, दि.१४/१०/२०२० व दिनांक १४/०५/२०२१ नुसार निर्गमित करण्यात येत आहे.

१०. सदरचे शासन ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०२२०२१६१३०००४५२०६ असा आहे. सदर ज्ञापन डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by GAJANAN RAMDAS DESHMUKH
Date: 2022.02.16 13:02:18 +05'30'

**( गजानन रा. देशमुख )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

**जिल्हा पुरवठा अधिकारी, नागपूर**

**प्रत आवश्यक कार्यवाहीस्तव -**

१) आहरण व संवितरण अधिकारी, नागपूर.
२) जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर.

**प्रत माहितीस्तव-**

१) उप आयुक्त (पुरवठा), नागपूर विभाग, नागपूर
२) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर.
३) वित्तीय सल्लागार व उपसचिव,अ.ना.पु.व.ग्रा.सं.वि., मंत्रालय, मुंबई.
४) श्री शुभम प्रकाश गजभिये (मार्फत : जिल्हा पुरवठा अधिकारी, नागपूर)
५) निवडनस्ती, ना.पु.१५.